कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (गट-ब) (अराजपत्रित) सरळसेवा परीक्षा २०१६ निवड झालेल्या उमेदवारास महसुली विभाग वाटप.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ससेवा १११७/(प्र.क्र.२३४/१७)/आ(तांत्रिक)**

मंत्रालय (नविन प्रशासकीय इमारत), १५ वा मजला,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.

दिनांक : १४ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा:-**

१) शासनाचे क्र.संकीर्ण क्र.२०१५/प्र.क्र.०१/आ(तां)/शिकाना, दि.१२.१२.२०१५ रोजीचे पत्र.

२) शासन निर्णय क्र.नियुक्ती १११७/(प्र.क्र.०१/२०१७)/आ.(तांत्रिक), दि.२५/०१/२०१७.

३) शासन निर्णय क्र.नियुक्ती १११७/(प्र.क्र.०१/२०१७) (भाग-३)/आ.(तांत्रिक), दि.२३.११.२०१७

४) शासन निर्णय क्र.नियुक्ती १११७/(प्र.क्र.०१/२०१७) (भाग-५)/आ.(तांत्रिक), दि.२४.०१.२०१८

५) अध्यक्ष, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) राज्यस्तरीय सरळसेवा निवड समिती तथा कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र जा.क्र.१५४/स्वीय सहायक/ विपाविम/२०१७/,दि.०६.०१.२०१६ चे पत्र.

६) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दि.२८ एप्रिल, २०१५, दि.१६ जुलै, २०१५ व एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.११४/कार्या-१२, दि.१५ जून, २०१७.

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.१ वरील पत्रान्वये कार्यकारी संचालक,विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय सरळसेवा निवड समिती स्थापन करण्यात आली आहे. संदर्भ क्र.५ वरील दिनांक ६.१.२०१७ च्या पत्रान्वये राज्यस्तरीय सरळसेवा निवड समितीने १२०२ राज्यस्तरीय कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदाची निवड प्रक्रिया पुर्ण करुन एकुण १२०२ पदाची शिफारस शासनास केली आहे. त्यानुसार मुख्य अभियंता,नियोजन व जलविज्ञान,नाशिक यांनी श्री.सुयोग सुधाकर शिंदे यांना पदस्थापना देण्याच्या अनुषंगाने त्यांच्या मूळ कागदपत्रांची तपासणी केली असता, श्री. शिंदे यांचेविरुध्द गुन्हा रजि.नं.७८८/२०१४ भादवि कलम ४९८(अ) ३०६,३४ अन्वये गुन्हा दाखल असल्याने तसेच सदर गुन्हा वसई न्यायालयात न्यायप्रविष्ठ असल्याचे पोलीस निरिक्षक,नालासोपारा पोलीस ठाणे यांनी दि.१६.५.२०१७ रोजी कळविले होते.सबब, श्री.सुयोग शिंदे यांच्या वरील खटल्याचा निकाल सत्र न्यायालय ,वसई, पालघर येथे प्रलबित असल्याने त्यांना नियुक्ती देण्यात आली नव्हती.तथापि,श्री.सुयोग शिंदे यांना उपरोक्त दाखल करण्यात आलेल्या गुन्हयात सत्र न्यायालय वसई, पालघर यांनी दि.३ मे, २०१९ च्या आदेशान्वये दोषमुक्त केले आहे. त्यामुळे कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (गट-ब) (अराजपत्रित) सरळसेवा परीक्षा-२०१६ अन्वये निवड झालेल्या श्री.सुयोग सुधाकर शिंदे यांना महसुली विभाग वाटप करुन नियुक्तीबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

"गट ब"(अराजपत्रित) (रुपये ९३००-३४८००+ग्रेड पे रुपये ४३००/-) (६ व्या वेतन आयोगानुसार) या वेतन श्रेणीतील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदावर निवड झालेल्या श्री.सुयोग सुधाकर शिंदे यांना खालीलप्रमाणे महसुली विभाग वाटप करण्यात येत आहे :-

| Sr. No. | Roll No. | Candidate Name | Gender | category | Selection category | Alloted Revenue Division | Alloted Chief Engineer |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १२०६३७ | SHINDE SUYOG SUDHAKAR | Male | Open | Open | Nagpur | Chief Engineer, Wrd, Nagpur |

श्री.शिंदे यांनी संबंधित मुख्य अभियंता कार्यालयाकडे संपर्क साधावा. तद्नंतर संबंधित मुख्य अभियंता यांनी सदर उमेदवारास नियुक्ती व सविस्तर पदस्थापना देणेबाबतची कार्यवाही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून पूर्ण करावी.

१. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.११४/कार्या-१२, दि.१५ जून, २०१७ मधील तरतूदीनुसार नागपूर, अमरावती व औरंगाबाद या महसुली विभागातील एकूण रिक्त पदांच्या ८०% पदे प्राथम्याने भरणे आवश्यक आहे. त्यानुसार श्री.सुयोग सुधाकर शिंदे यांना नागपूर महसूल विभाग वाटप करण्यात येत आहे.

२. कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदाचे नियुक्ती प्राधिकारी मुख्य अभियंता हे आहेत. सदर शासन निर्णयान्वये वाटप करण्यात आलेल्या सदर उमेदवारास मुख्य अभियंता कार्यालयाने त्यांना तातडीने ई-मेलद्वारे / मोबाईलद्वारे (एस.एम.एस.) संपर्क करुन १५ दिवसांत कागदपत्रे / प्रमाणपत्रे तपासणीची कार्यवाही पूर्ण करावी. तसेच, संबंधित मुख्य अभियंता यांनी उपरोक्त रकान्यामध्ये नमूद सरळसेवेव्दारे निवड झालेल्या उमेदवाराकडून शासनाने विहीत केलेल्या साक्षांकन नमुन्यामध्ये माहिती घ्यावी व त्यांची सर्व मूळ कागदपत्रे / प्रमाणपत्रे यांची तपासणी करुन, तपासणीअंती योग्य उमेदवारास सविस्तर पदस्थापना / नियुक्ती देण्याची जबाबदारी ही संबंधित मुख्य अभियंता यांची राहील.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: चापअ-१००८/प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दि.९ जानेवारी, २००९ मधील तरतूदीनुसार चारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून सदर उमेदवारास नियुक्ती देण्यात यावी. तथापि, नियुक्तीच्या तारखेपासून ६ महिन्यांच्या आत संबंधित पोलिस अधीक्षकांचा चारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त न झाल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल असे नियुक्ती आदेशात स्पष्ट करण्यात यावे. तसेच चारित्र्य पडताळणी अहवाल असमाधानकारक असल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता १ महिन्याची नोटीस देऊन समाप्त करण्यात यावी.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ११(१) मधील तरतूदीनुसार नियुक्तीच्या तारखेपासून ६ महिन्यांची सेवा होण्यापूर्वी त्यांचे आरोग्याबद्दलचे वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. सदर उमेदवार वैद्यकीय तपासणीमध्ये पात्र असण्याच्या अटीच्या अधीन राहून सदर नियुक्ती देण्यात यावी. सदर उमेदवार वैद्यकीय तपासणीमध्ये अपात्र आढळल्यास नियमातील तरतूदीनुसार त्यांची सेवा समाप्त करण्यात यावी.

५. श्री.शिंदे यांना महाराष्ट्र शासकीय गट “अ” व गट “ब” (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप नियमावली क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२,दि.२८ एप्रिल,२०१५,दि.१६ जुलै,२०१५ व एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.११४/कार्या-१२, दि.१५ जून, २०१७. मधील तरतुदी लागू राहील. वाटप केलेला महसुली विभाग बदलीकरीता कोणत्याही मार्गाने प्राप्त झालेला अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

६. श्री.शिंदे यांची सेवाज्येष्ठता शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही १०७६/१२, दि.२१/०६/१९८२ अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम, १९८२ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात येईल.

७. कनिष्ठ अभियंता गट “ब” (अराजपत्रित) मधील उमेदवारांची नियुक्ती ही खालील विहित शर्तींच्या अधीन असेल:-

अ) श्री.शिंदे यांना नियुक्ती प्राधिका-याकडून नियुक्ती आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत त्यांच्या नेमणूकीच्या ठिकाणी रूजू झाले पाहीजे.

आ) अन्यथा एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. कार्यालय प्रमुखांनी एक महिन्यानंतर रूजू होणा-या उमेदवारास रूजू करून घेवू नये. तसेच, उमेदवाराकडून रुजू होण्याबाबत मुदतवाढ मिळणेबाबत अर्ज प्राप्त झाल्यास याबाबत नियुक्ती प्राधिकारी या नात्याने संबंधित मुख्य अभियंता यांनी/अध्यक्ष कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), (गट-ब) (अराजपत्रित) राज्यस्तरीय सरळसेवा निवड समिती तथा कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांच्याशी विचारविनिमयाअंती त्यांचे स्तरावर शासन नियमानुसार निर्णय घ्यावा.

इ) मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या उमेदवाराने जातीचा दावा संबंधित विभागीय जात प्रमाणपत्र वैधता पडताळणी समिती कडून पडताळणी करून घेऊन, जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र नियुक्ती प्राधिका-यास सादर करणे आवश्यक राहील. ज्या उमेदवारांने जातवैधता प्रमाणपत्र सादर केलेली नाही,अशा उमेदवारास सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.बीसीसी-२०११/ प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब दि.१२.१२.२०११ मधील तरतुदीच्या अनुषंगाने नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या आत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात यावी. उमेदवार मागास प्रवर्गातील असल्यास नियुक्ती आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत जातवैधता प्रमाणपत्र संबंधित नियुक्ती प्राधिका-यास सादर करावे. अन्यथा नियुक्ती आदेश रद्द करण्यात यावे.

८. आवश्यकता भासल्यास उपरोक्त रकान्यामधील उमेदवारास भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरून चार वर्षापेक्षा कमी नसणा-या कालावधीसाठी भारत सरकार ठरविल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु

अ) श्री.शिंदे यांना त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही, किंवा-

आ) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर अशी सेवा करावी लागणार नाही.

९. श्री.शिंदे यांनी हिन्दी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा तिला भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

१०. श्री.शिंदे यांना शासनाने विहित केलेली संगणक विषयक अर्हता परिक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल तर, शासनाने विहित केलेली संगणक विषयक अर्हता परीक्षा या संबंधी असलेल्या नियमांनुसार उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

११. श्री.शिंदे हे सेवेत रूजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्यांना शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.२/१२/९७ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिका-याला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन सक्षम प्राधिका-याला राहणार नाही.

१२. श्री.शिंदे हे ज्या दिवशी सेवेत रूजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधित अधिका-याकडे पाठवून विभाग/कार्यालय प्रमुखांनी याबाबत संबंधित सक्षम प्राधिका-यांकडे पाठवावे.

१३. श्री.शिंदे हे जर सध्या शासनाच्या इतर विभागात काम करीत असतील तर संबंधित नियंत्रक अधिका-यांनी त्यांना नेमणूकीचे ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र कार्यालय प्रमुख/सक्षम प्राधिकारी यांना सादर केल्याशिवाय त्यांना रूजू करून घेता येणार नाही.

१४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अंनियो १००५/१२६/सेवा-४ दि.३१/१०/२००५ अन्वये सदर उमेदवारास नविन परिभाषीत अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल व भविष्य निर्वाह निधी योजना त्यांना लागू होणार नाही. मात्र उपरोक्त उमेदवार १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्ति वेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंनियो १००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी २००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून महाराष्ट्र नागरी सेवा(निवृत्ती वेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू करण्यासंदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

१५. श्री.शिंदे यांना सेवाप्रवेश नियमानुसार व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

१६. विशिष्ट ठिकाणी पदस्थापना/बदली/नियुक्ती मिळविण्यासाठी खासदार /आमदार / लोकप्रतिनिधी / खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित उमेदवारास म.ना.से.(वर्तणुक) नियम, १९७९ मधील नियम क्र. २३ मधील तरतुद

निर्देशनास आणून देण्यात यावी व आवश्यक असल्यास संबंधित उमेदवाराविरूद्ध महाराष्ट्र नागरी सेवा(शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

१७. विमुक्त जाती(अ), भटक्या जमाती(ब), भटक्या जमाती(क), भटक्या जमाती(ड), इतर मागास वर्ग तसेच अमागास(महिला) या वर्गवारीवर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवाराची सक्षम प्राधिका-यांनी प्रमाणित केलेली उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याबाबतची विहित नमुन्यातील (NCL) प्रमाणपत्र नियुक्तीपूर्वी संबंधित प्राधिका-यांकडून तपासून घेऊन त्यांच्या नियुक्तीबाबत निर्णय घ्यावा.

१८. अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडू पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवाराची क्रिडा विषयक प्रमाणपत्रे शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रिडा विभाग क्र.राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीसुसे-२, दिनांक ३० एप्रिल, २००५ तसेच शासन निर्णय,क्र.राक्रीधो-२००२/ प्र.क्र.६८/क्रीयुसे-२,दि.१/७/२०१६ व शासन शुध्दीपत्रक क्र.राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दि.१०/१०/२०१७ नुसार त्यांच्या नियुक्तीपूर्वी, संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून तपासून घेण्यात यावी.

१९. सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना, २८ एप्रिल २०१५ नुसार सरळसेवेने नियुक्ती झालेल्या उमेदवारांबाबत तसेच, गट “ब” संवर्गात नियुक्त झालेल्या उमेदवारांनी त्या महसूली विभागात किमान ९ वर्षे इतका सेवा कालावधी पूर्ण करणे आवश्यक राहील.

२०. तसेच सदर उमेदवाराच्या बाबतीत शासनाच्या प्रशिक्षणविषयक प्रचलित धोरणांचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित नियुक्ती प्राधिका-याची राहील.

२१. उपरोक्त निदेशांव्यतिरिक्त शासनाचे नियुक्तीसंदर्भातील प्रचलित आदेश विचारात घेऊन नियुक्ती देण्यासंदर्भात कार्यवाही करावी व शासनाचे सदर प्रचलित आदेश उमेदवारांना बंधनकारक राहतील ही बाब नियुक्ती आदेशात स्पष्ट करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२०१०१४१५५६००८७२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83469494bac86099a320f3e14bf8421ee9d2b48e344470b76ea2595df04951b4, serialNumber=02c5c00269dd48836be0d9939bdff848a9ff1f1a9fd195baf3a104d09b0817d9, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2020.10.14 15:57:41 +05'30'

**( वि.म.राजुरकर )**
**अवर सचिव (महाराष्ट्र शासन)**

**प्रत,**

१. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
३. आरस्था(तां) संग्रहार्थ.